**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित यांच्या कार्यालयातील कर्मचाऱ्यांकरिता ३ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२० / प्र.क्र.२१ /सां.का.१**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ सप्टेंबर, २०२०.

वाचा : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१ डिसेंबर,२०१९.
२) मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई यांचे पत्र क्र.माअमा/प्रशा-१/ प्र.क्र.४६/२०१८/ १४१८, दि.२६.१२.२०१९.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३० जून, २०२०

**प्रस्तावना :**

उपर्निर्दिष्ट क्र. १ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि, जाती दावा पडताळणी समितीकडून वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करणे, तसेच उक्त अनुसूचित जमातीच्या पदावर नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांची रिक्त होणारी पदे भरण्यासाठी विहित कार्यवाही करण्याबाबत निर्देशीत केलेले आहे. या विभागाच्या अधिनस्त महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई या कार्यालयातील परिचर (गट-ड) या संवर्गात ३ अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पडताळणीसाठी विहित मुदतीत प्रस्ताव सादर न केलेल्या खालील नमूद कर्मचाऱ्यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी संबंधित कार्यालयाच्या आस्थापनेवर या शासन निर्णयान्वये ३ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत.

**१.** अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र, जात वैधता प्रमाणपत्र पडताळणी समितीकडे पडताळणीसाठी विहीत मुदतीत प्रस्ताव सादर न केलेले परिचर (गट-ड) संवर्गातील ३ कर्मचाऱ्यांचा तपशिल खालील तक्त्यात नमूद केलेला आहे.

| अ.क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम व गट | नियुक्तीचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | श्रीमती शेवंती हडळ | परिचर (गट-ड) | ०५.०१.१९९९ |
| २ | श्रीमती भारती पाटकर | परिचर (गट-ड) | ०१.०७.१९९७ |
| ३ | श्री.विष्णू भोवरे | परिचर (गट-ड) | ०१.०६.१९९६ |

२. उपरोक्त नमूद केल्यानुसार एकूण ३ अधिसंख्य पदे महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत. सदर अधिसंख्य पदांबाबत शासन निर्णय क्र.असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.०९.२००१ मधील कार्यपध्दतीनुसार वित्त विभागाची मान्यता घेण्यात येईल.

३. अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे कर्मचारी सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून सर्व संबंधित नियुक्ती अधिकाऱ्यांनी करावयाच्या नियुक्त्या तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंतच्या कालावधीसाठी कराव्यात. सदर कर्मचारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्तित्वात राहील.

४. या आदेशान्वये निर्माण केलेल्या अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्याबाबतचे आदेश सामान्य प्रशासन विभाग / कार्यासन १६ ब, शासन निर्णय दि.२१.१२.२०१९ नुसार महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई यांनी तात्काळ निर्गमित करावेत व त्याची प्रत या विभागास तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.

५. हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दि.२१.१२.२०१९ व दि.३०.०६.२०२० च्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार तसेच वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.१६०/आपुक, दि.१३.०३.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००९३०१२०११३४४२३ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Prasad Mahadeo Mahajan

Digitally signed by Prasad Mahadeo Mahajan
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tourism & Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6fcffe7574d536c6e270856345547bb470a3e70655baa82e214fc4d0cfaccaed, serialNumber=b8ea3f1827aabafa30caec97c98f4c9643851c3a32cfa11a13f635fc0bea0ac3, cn=Prasad Mahadeo Mahajan
Date: 2020.09.30 17:07:25 +05'30'

**( प्रसाद महाजन )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे खाजगी सचिव
३. सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
४. उप सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, गोरेगाव, मुंबई
६. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य ( लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
८. अवर सचिव (आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती, सां.का.१.